विद्यमान शासकीय तंत्रनिकेतनांमध्ये अल्पसंख्याक विद्यार्थ्यांसाठी दुसरी पाळी सुरू करणे.

सन २०१४-१५ करिता अनुदानाचे वाटप.

**महाराष्ट्र शासन**

**अल्पसंख्याक विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः तंत्रनि-२०१४/प्र.क्र. ६९/का.८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

तारीख: ३१ मार्च, २०१५.

वाचा -

१) शासन निर्णय क्रमांकःउच्च व तंत्र शिक्षण विभाग,क्रमांक:टिईडी-२०१० /(३३४/२००९)/तांशि-५, दि. १३/९/२०११.

२) शासन निर्णय क्रमांकः उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. :टिईडी-२०११/(३४७/२०११)/तांशि-५, दि. १९/७/२०१२.

३) शासन निर्णय क्रमांकः उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. :मान्यता-२०१४/प्र.क्र.७०/तांशि-५, दि. ८ जुलै, २०१४

४) समक्रमांकाचे शासन निर्णय : दि.७ जुलै, २०१४, दि.२७ नोव्हेंबर, २०१४ व दि.११ फेब्रुवारी, २०१५.

५) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांचे क्रमांक ९/नियोजन/तंत्रशिक्षण / अल्पसुद.पा/२०१४ दि.०५.०३.२०१५ रोजीचे मागणीपत्र.

६) वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक : पूरक-२०१५/प्र.क्र.७६/अर्थसंकल्प-३, दि.२४ मार्च, २०१५.

प्रस्तावना :-

संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णय अन्वये सन २०११-१२ पासून ठाणे, सोलापूर, जळगाव, नांदेड, यवतमाळ, मुंबई शहर व मुंबई उपनगर या ७, संदर्भ क्रमांक २ येथील शासन निर्णय अन्वये सन २०१२-१३ पासून रत्नागिरी, कराड, ब्रम्हपुरी, जालना, अंबड या ५ व संदर्भ क्रमांक ३ येथील शासन निर्णय अन्वये सन २०१४-१५ पासून पुणे,लातूर,हिंगोली या ३ अशा एकूण १५ ठिकाणच्या शासकीय तंत्रनिकेतनांमध्ये अल्पसंख्याक विद्यार्थ्यांसाठी दुसरी पाळी सुरू करण्यात आली आहे. संदर्भ क्रमांक ६ येथील वित्त विभागाचे दि.२४ मार्च, २०१५ च्या सन २०१४-१५ चे खर्चाचे पूरक विवरणपत्रबाबत पूरक मागण्यांच्या रक्कमांचे वाटप करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

शासकीय तंत्रनिकेतनामध्ये अल्पसंख्यांक विद्यार्थ्यांसाठी सुरू करण्यात आलेल्या दुस-या पाळीचा खर्च भागविण्यासाठी " मागणी क्रमांक झेड ई-१, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २००- इतर कार्यकम, राज्य योजनांतर्गत योजना, (०१) (३०) अल्पसंख्याक विद्यार्थ्यांसाठी विद्यमान शासकीय तंत्रनिकेतनांमध्ये दुसरी पाळी सुरू करणे, (२२३५ बी ०२२)" या लेखाशीर्षाखाली सन २०१४-१५ या वर्षाकरिता रु.८,०६,१०,०००/- ( रुपये आठ कोटी सहा लाख दहा हजार फक्त ) इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. आता रु.२,५९,९५,०००/- (अक्षरी रुपये दोन कोटी एकोणसाठ लाख पंच्याण्णव हजार फक्त) इतकी तरतूद खालीलप्रमाणे वितरीत करण्यास याव्दारे शासन मान्यता देण्यात येत आहे :-

(हजारात)

| अ.क्र. | बाब | या शासन निर्णयाव्दारे वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|
| १ | ०१ वेतन | २५९९५ |
| **एकूण** | | **२५९९५** |

२. सदर तरतूद संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत असून याकरिता ते नियंत्रक अधिकारी आणि त्यांनी प्राधिकृत केलेले दुय्यम अधिकारी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पाहतील.

३. या योजनेअतंर्गत अल्पसंख्याक समाजातील विदयार्थ्याना प्रवेश देण्यात येऊन त्याचा तपशील वेळोवेळी अल्पसंख्याक विकास विभागास सादर करावा. तसेच सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे व केलेल्या खर्चाचा तपशील व उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी विहित मुदतीत शासनास आणि महालेखापाल कार्यालयास सादर करावे.

४. सदर रक्कम वितरीत करण्यापूर्वी संचालक,तंत्रशिक्षण संचालनालय मुंबई यांनी शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय/कार्यालयीन आदेश/वित्तीय नियमावली/ सार्वजनिक बांधकाम विभागाची कार्यनियमावली/भारताचे नियंत्रक व महालेखापरिक्षक यांचे निरिक्षण अहवाल/वित्तीय कार्यपध्दती यांचा अवलंब करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३३११२३७३२९११४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Samir Ramesh Salunkhe

Digitally signed by Samir Ramesh Salunkhe
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Samir Ramesh Salunkhe
Date: 2015.03.31 14:42:53 +05'30'

**( समीर साळुंखे )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. महालेखापाल, (लेखा परिक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर

२. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर

३. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,

४. संचालक , तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई ,

५. प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतने, ठाणे, सोलापूर,जळगाव,नांदेड,यवतमाळ, मुंबई शहर,

६. मुंबई उपनगर, रत्नागिरी, जालना, अंबड, ब्रम्हपूरी, कराड, पुणे हिंगोली व लातूर

७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,

९. नियोजन विभाग का. १४७५,

१०.वित्त विभाग, व्यय-४/ अर्थ-३ व १४,

११.अवर सचिव (का.७), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना विनंती करण्यात येते की, कृपया सदर निधी B.D.S. वर तात्काळ उपलब्ध करुन द्यावा.

१२.निवडनस्ती.